**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१२१/३१(राजशिष्ठाचार)**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक:-२४ जुलै, २०१५.

**शासन परिपत्रक**

सह्याद्री राज्य अतिथीगृहात मा.राष्ट्रपती, मा.पंतप्रधान, मा.उप राष्ट्रपती, मा.केंद्रीयमंत्री/ राज्यमंत्री, इतर राज्यांचे मा.राज्यपाल, मा.मुख्यमंत्री, मा.सर्वोच्च न्यायालयाचे सरन्यायाधिश व न्यायाधिश, केंद्र शासनाचे अति वरिष्ठ अधिकारी अशा स्तरावरील मान्यवरांची निवास व्यवस्था करण्यात येते. त्याच प्रमाणे येथे मा.मुख्यमंत्री महोदयांचे कार्यालय व कॅबीनेट हॉल आहे. अशा रीतीने या ठिकाणी उच्च दर्जाची सुरक्षा व्यवस्था असलेल्या मान्यवरांचा सतत राबता असतो. तसेच या अतिथीगृहात मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री या सारख्या मान्यवरांच्या अध्यक्षतेखाली बैठका आयोजीत करण्यात येतात. त्याकरिता सह्याद्री राज्य अतिथीगृहाचा दर्जा अत्युच्च ठेवण्यात आला आहे. त्या अनुषंगाने येथे अतिवरिष्ठ स्तरावरील बैठका आयोजीत करण्यास राजशिष्टाचार शाखेमार्फत अनुमती देण्यात येते. अशा रीतीने, सह्याद्री अतिथीगृहात प्रवेश अत्यंत मर्यादीत ठेवण्यात आलेला आहे.

२. या विभागाच्या असे निदर्शनास आले आहे की, मा.मंत्री महोदयांकडून सह्याद्री राज्य अतिथीगृहात सुनावण्या आयोजीत करण्यासाठी दालनांचे आरक्षणाची मागणी करण्यात येते. मा.मंत्री महोदयांमार्फत आयोजीत करण्यात येणा-या सुनावण्यांच्या दिवशी पक्षकारासोबत अनावश्यक व्यक्तींना प्रवेश द्यावा लागतो. तसेच अनेक व्यक्ती सुनावणी संपल्यानंतरही तेथेच थांबून रहातात. त्यामुळे मोठ्या प्रमाणावर गर्दी होते.

३. सह्याद्री राज्य अतिथीगृह येथे सुरक्षा रक्षकांची संख्या फारच कमी प्रमाणात आहे. त्याच प्रमाणे पोलीस सुरक्षा व्यवस्थेमार्फतही अशा गर्दीच्या वेळी काटेकोरपणे तपासणी करणे शक्य होत नाही. तसेच सुनावणीसाठी येणा-या पक्षकारांकडे ओळखपत्र वा इतर ओळख पटविणारे कागदपत्रे नसल्याने कोणतीही ओळख न पटवता प्रवेश देणे क्रमप्राप्त ठरते. सदर बाब सुरक्षिततेच्या दृष्टीकोणातून अयोग्य असल्याचे पोलीसांनी वेळोवेळी निदर्शनास आणले आहे.

४. वर नमुद वस्तुस्थिती व सह्याद्री राज्य अतिथीगृहातील मान्यवरांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीकोणातून या परिपत्रकान्वये सर्व विभागांना खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

अ) सह्याद्री राज्य अतिथीगृहात कोणत्याही प्रकारच्या सुनावण्या आयोजीत करण्यात येऊ नयेत. तसेच सुनावण्यांसाठी कक्ष आरक्षणाची मागणी करण्यात येऊ नये.

आ) सह्याद्री राज्य अतिथीगृहात यापुढे फक्त मा.मुख्यमंत्री, मा.उपमुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.मुख्यसचिव, अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव वा त्या दर्जाच्या अधिका-यांच्या अध्यक्षते खालील वरिष्ठ अधिका-यांच्या बैठका/ कार्यशाळा/ पत्रकार परिषदा आयोजीत करण्यात याव्यात,

इ) वर नमुद बैठकांसाठी आरक्षण निश्चित झाल्यानंतर बैठकीसाठी निमंत्रितांची यादी एक दिवस आधी व्यवस्थापक, सह्याद्री राज्य अतिथीगृह यांना न चूकता देण्यात यावी, जेणेकरून निमंत्रितांना प्रवेश देणे सुलभ होईल,

ई) अशा बैठकांसाठी निमंत्रितांची संख्या मर्यादीत असावी,

५. सर्व विभागांना विनंती करण्यात येते की, सह्याद्री राज्य अतिथीगृहात सुनावण्या आयोजीत न करणेबाबत त्याच प्रमाणे बैठकां/कार्यशाळांबाबत उपरोक्त सुचनांचे पालन करण्यात यावे. तसेच सदर सुचना त्यांच्या अधिपत्याखालील मुंबई/ मुंबई उपनगरातील सर्व शासकीय कार्यालये/आस्थापनांच्या निदर्शनास आणाव्यात.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०७२७१६१३०३५००७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Digambar Suryawanshi

Digitally signed by Anil Digambar Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Gad Protocol, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anil Digambar Suryawanshi
Date: 2015.07.27 16:15:45 +05'30'

(अ. दि. सुर्यवंशी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव/सचिव/उप सचिव.
२) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई.
४) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
५) प्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई.
६) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) व्यवस्थापक, सह्याद्री राज्य अतिथीगृह, मलबार हिल, मुंबई.
८) निवडनस्ती-३१.